**मौजे पात्रूड ता. माजलगाव जि.बीड येथील पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१२/प्र.क्र.२८७/पापु-१८.**
नवीन प्रशासन भवन
मंत्रालय, मंबई ४०० ०३२
दिनांक: १९ जानेवारी, २०१५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्र. ग्रापापु-१००७/प्र.क्र.२४३/पापु-०७/ दिनांक ४ फेब्रुवारी,२००९.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.बीड यांचे पत्र क्र.ग्रापापुवि/जिपबी/तांशा-५/२५५९ दि.१६.९.२०११.
३) कार्यकारी अभियंता, जि.प. बीड यांचे पत्र क्र. ग्रापापुवि/जिपबी/तांशा-५/२०१४, दि. २७.१०.२०१४

**प्रस्तावना :-**

मौजे. पात्रुड ता.माजलगाव जि.बीड या पाणी पुरवठा योजनेच्या कामास केंद्र पुरस्कृत वर्धित वेग कार्यक्रमा अंतर्गत रु. २३१.१६ लक्ष रक्कमेच्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास ग्रामपंचायत पात्रुड यांना दिनांक २६.१.२००९ रोजी प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि काही अपरिहार्य कारणामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. सदर वाढ ही मुळ अंदाजपत्रकीय किंमतीच्या १५% पेक्षा जास्त असल्यामुळे संदर्भाधिन शा.नि.क्र.१ नुसार मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प.बीड यांनी सदर प्रस्ताव या विभागाकडे सादर केला होता. त्याप्रमाणे मौजे. पात्रुड ता. माजलगाव जि. बीड. या पाणी पुरवठा योजनेचा सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने मौजे. पात्रुड ता.माजलगाव जि.बीड या पाणी पुरवठा योजनेच्या रु. २९३.५५ लक्ष ( दोनशे यान्नव लक्ष पंचावन्न हजार फक्त ) किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास या शासन निर्णयान्वये खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) ही योजना जिल्हापरिषद बीड मार्फत कार्यान्वित करण्यात येईल.
२) मुळ प्रशासकीय योजनेतील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे
३) योजनेची सर्व कामे सुधारीत अंदाजपत्रकाच्या मर्यादेत ६ महिन्यात पुर्ण करुन सबंधित ग्रामपंचायतीस हस्तांतरीत करण्यावी यावी.
४) योजनेचे लेखे बंद करुन योजना ग्रामपंचायतीकडे हस्तांतरीत करण्यात यावी.
५) त्यानंतर योजना पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हापरिषदेची राहील.
६) ही योजना राबविणे, त्यांचे परिरक्षण दुरुस्त्या ( विशेष दुरुस्त्या धरुन ) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवीकरण निधीसाठी किंवा योजनेच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारता येणा-या पाणी पट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल असे बघण्याची जबाबदारी सबंधीत ग्रामपंचायतीची/ जिल्हापरिषदेची राहील. त्यानुसार या योजनेसाठी पाणीपट्टीचा दर आकारण्यात यावा. याप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिकदृष्टया स्वयंपुर्ण झाली नाही. तर देखभाल दुरुस्तीचा जादा खर्च

ग्रामपंचायतीस/जिल्हापरिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल. तसेच सदर योजनेच्या कामाचा पुर्णत्वाचा दाखला त्वरीत सादर करण्यात यावा.

७) सन-२०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी विज देयके न भरल्यामुळे बंद पडल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना अर्थिकदृष्टया सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

२. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौ-संदर्भ क्र.३०९/१४४३ दिनांक ६.१२.२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७३६/व्यय-३, दिनांक २४.१२.२०१४ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०११९१५२५४७१२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHADGE RAMDAS M

Digitally signed by GHADGE RAMDAS M
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=GHADGE RAMDAS M
Date: 2015.01.19 15:34:33 +05'30'

**( रा. म. घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
३) जिल्हाधिकारी, बीड.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. बीङ
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना.व.ग्रा.मंडळ, बीड
७) कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकाण, ना.व.ग्रा.योजना मंडळ, बीड.
८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हापरिषद, बीड.
९) संचालक भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे-४११ ०३७.
१०) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) महालेखाकार, ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
१३) निवडनस्ती,पापु-१८